**मौलाना आझाद अल्पसंख्यांक**
**<u>आर्थिक विकास महामंडळाची स्थापना</u>**

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
**शासन निर्णय** क्रमांक इएसई-१०९९/प्र.क्र.३६८/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय भवन, १४वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २००१

**<u>शासन निर्णय</u>**: शासनातर्फे राज्यातील वेगवेगळ्या मागासवर्गीय प्रवर्गासाठी त्यांच्या कल्याणासाठी व आर्थिक तसेच सामाजिक उन्नतीसाठी निरनिराळ्या विकास महामंडळाची स्थापना करण्यात आलेली आहे. राज्यात आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकांची संख्या मोठ्या प्रमाणावर असून त्यामध्ये अल्पसंख्यांक समाजाचाही समावेश आहे. शासनाने अल्पसंख्यांक समाजातील दुर्बल घटकांच्या आर्थिक उन्नतीसाठी महामंडळाची स्थापना करण्याचा निर्णय घेतला आहे. या निर्णयास अनुसरुन राज्यातील अल्पसंख्यांक समाजातील दुर्बल असलेल्या व्यक्तींसाठी त्यांच्या कर्तबगारीला निधीचे पाठबळ देऊन त्यांचा आर्थिक उन्नतीचा मार्ग खुला करण्यासाठी, त्यांच्यासाठी स्वयंरोजगाराच्या योजना राबवून त्यात येणा-या अडचणी दूर करण्यासाठी ''मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाची '' स्थापना करण्याचे शासनाने ठरविले.

२. हे महामंडळ कंपनी अधिनियम, १९५६ च्या अंतर्गत दिनांक २८ सप्टेंबर, २००० रोजी नोंदणीकृत करण्यात आले आहे व त्या दिनांकापासूनच हे महामंडळ अस्तित्वात आले आहे. या महामंडळाचे नांव ''मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ मर्यादीत '' असे राहील.

३. या महामंडळाचे अधिकृत भागभांडवल रू.५० कोटी इतके राहील. या महामंडळाचे मुख्य कार्यालय दुसरा मजला, डी.डी.ए. इमारत, जुने जकात घर, शहीद भगतसिंग मार्ग, मुंबई-४०० ०२३ येथे राहील.

४. या महामंडळाच्या संचालक सदस्यांची संख्या जास्तीत जास्त १५ इतकी राहील. महामंडळाचे प्रारंभीचे संचालक मंडळ शासन निर्णय क्रमांक मौआमं-२०००/प्र.क्र.२१६/रोस्वरो-१ दिनांक २० ऑक्टोबर,२००० व ८ मार्च,२००१ अन्वये अस्तित्वात आले आहे. ते खालीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| श्री. हाफिजभाई धत्तूरे | अध्यक्ष |
| श्री. मिसबाह आलम, मुंबई | -सदस्य |
| श्री. मुझफ्फर अहमद S/O मोहम्मद युसुफ, अमरावती | -सदस्य |
| ॲड. समद पटेल, लातूर | -सदस्य |

GR-200201211758 36000 - 2600
M-gr7

| | |
|---|---|
| श्री. सय्यद फारुख सैय्यद करीम, यवतमाळ | -सदस्य |
| श्री. मकबूल सलीम, नांदेड | -सदस्य |
| श्री. अिलीयास नायाकवडी,सांगली | -सदस्य |
| श्रीमती नसीम महात, सांगली | -सदस्य |
| श्री. मोहम्मद इस्माईल हमदुले,जालना | -सदस्य |
| श्री. अमिनुद्यीन पेनवाले, पुणे | -सदस्य |
| सचिव, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, | -सदस्य |
| आयुक्त , रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, | -सदस्य |
| व्यवस्थापकीय संचालक, | -सदस्य सचिव |

५. या महामंडळाच्या मुख्यालयासाठी सुरूवातीस एकूण १० पदांची निर्मिती करण्यात आली आहे.

६ हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनुक्रमे १००/१४४३ दिनांक ३/४/२००० व १२१/०१/साउ दि.२६/२/२००१अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( भु. प्र. पाण्डेय)
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुबई- ४०० ०३२.
मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्यसचिव/प्रधान सचिव/सचिव
महालेखापाल, महाराष्ट्र १,लेखा व अनुज्ञेयता, मुंबई
महालेखापाल महाराष्ट्र २ , लेखा व अनुज्ञेयता, नागपूर
अधिदान व लेखाधिकारी मुंबई
निवासी लेखा परिक्षण अधिकारी,
संचालक, रोजगार व स्वयंरोजगार महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
सर्व जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र,
निवड नस्ती

GR- 200201211758 36000 - 2600